॥ श्री रामप्रसन्न ॥

# श्रीमारुति–उपासना.






संपादक

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.**

'मुमुक्षु' कर्ते पुणें.

---

**मुद्रकः–महादेव नारायण कवडे,**

[illegible]णें, 'ज्ञान[illegible]' प्रेस.

---

रामनवमी [शके १८३०.

---

किंमत २ आणे.

# श्रीमारुति–उपासना.

## प्रस्तावना.

अंजनीगर्भसंभूतो वायुपुत्रो सनातनः ।
कुमारो ब्रम्हचारी च तस्मै हनुमते नमः ॥ १ ॥

१ अलीकडे शिक्षणपद्धती पार बिघडून गेल्यामुळें आमच्या तरुणसमाजांत ीरसामर्थ्य, बुद्धिबळ व भक्तीचा जिव्हाळा यांचा लोप झाला आहे, ही गोष्ट चारवंतांस कळूं लागल्यामुळें राष्ट्रीयशिक्षणाची वाटाघाट चालू झाली असून तंत्र शाळा निघत आहेत. हें सर्व ठीक आहे, पण ' उपासनेला दृढ चालवावें ' श्रीसमर्थोक्तीचें मर्म अद्याप कोणाच्याही लक्षांत येत नाहीं! भिल्हासभेपासून ष्ट्रीयसभेपर्यंतच्या सर्व चळवळींत ' धर्मशिक्षणाचें ' कोणी नांव ही काढीत हीं ! धर्मशिक्षणावांचून शीलवंत पुरुष तयार होणें अशक्य आहे. थंड पाण्याचें ातःस्नान, संध्यावंदनादि नित्यनेम, ब्रह्मकर्म, सूर्यास नमस्कार, पंचमहायज्ञ व कनिश्चयाची उपासना हा मार्ग तरुण पिढीस अजुन लागेल, ब्रह्मचर्य आणि ीर्यसंरक्षण यांचें महत्व सर्वांस कळेल, व कर्तव्यकर्मं रामार्पणबुद्धीनें करायचा भ्यास वाढेल, तर प्रतापी राष्ट्रपुरुष निर्माण झाल्याशिवाय राहणार नाहींत. उपासनामार्ग चालावला म्हणजे सर्व कांही होईल.

२ कोणत्याही देवतेची उपासना केली तरी फळ एकच आहे. मारुतीची–उपासना तरुण विद्यार्थ्यांत वाढावी या हेतूनें मीं हा अल्प प्रयत्न केला आहे. आपल्या राष्ट्राला तूर्त वीर्यवंताची उपासना पाहिजे आहे. ' बलभीमाची ' उपासना केल्यानें उपासकही बलिष्ट होतात. मारुतीची उपासना करूनच समर्थ ' समर्थ ' पदवीला प्राप्त झाले. मारुतीचें ब्रह्मचर्य, मारुतीची रामभक्ति, व मारुतीचें [illegible]कर बोध, मारुतीची उपासना करितां करितां समर्थांना प्राप्त झालें.

ज्या वस्तूचें ध्यान करावें तदाकार मन होतें. मारुतीचें जो अखंड ध्यान करील त्यावर मारुति प्रसाद करितो व याबद्दल रामदासस्वामीच ग्वाही देऊन सांगतात. मारुतीला ' बलभीम ' म्हणतात. ही पदवी एकट्या मारुतीला आहे. जगांत जीं अनेक बळें आहेत, तीं सर्व मारुतिरायाच्या ठिकाणीं एकवटल्यामुळें ते आपल्या ' निस्सीम बळानें दुष्टांना भिवविणारे ' झाले म्हणून त्यांना ' बळभीम ' म्हणतात. मुख्य बळें तीन प्रकारचीं आहेत. पहिलें शरीरबळ, दुसरें बुद्धिबळ, व तिसरें भक्तिबळ. शरीरबळावांचुन जगाला धाक बसत नाहीं; शरीरबळाशिवाय स्वातंत्र्य, यश, व सौख्य यांची प्राप्ती नाहीं; शरीरबळावांचुन इतर बळांची दुष्टांवर छाप बसत नाहीं, म्हणून शरीरबळ-शक्तिबळ—पाहिजे. पण नुसत्या शरीरबळानें भागत नाहीं. अक्कलवंत मनुष्य हिंस्र पशूंनाही आपल्या कह्यांत वागवितो. साहेबांना शहाणे योद्ध्यांनाही आपल्या मुठींत वागवीत. म्हणून अक्कल, बुद्धि, किंवा युक्ति पाहिजे. युक्तिबळाचा पाठिंबा मिळाला, पण यानेंही भागत नाहीं. परमात्म्याचीं सूत्रें कळून त्याचें गूढ उकललें पाहिजे; त्याशिवाय दिव्यतेज, दिव्यसामर्थ्य, दिव्यदृष्टि यांचें दिव्यत्व प्राप्त होत नाहीं. मुसलमानांत शक्तिबळ अधिक आहे, युरोपिअनांत युक्तिबळ अधिक आहे, हिंदूंत भक्तिबळ अधिक आहे. आज पृथ्वीच्या पाठीवर राष्ट्रांराष्ट्रांचे जे झगडे चालले आहेत त्यांत आम्ही सर्वांच्या तळाशीं बसलों आहोंत. ज्यांनीं सर्वांच्या शिरीं बसावें, त्यांना सर्वांच्या पायीं बसावयाची पाळी आली आहे. प्राचीनकाळीं आपल्यापाशीं तीनीही बळें होतीं. हीं तीनही बळें आपण जर पुन्हा कमाऊं तर पुन्हा साऱ्या पृथ्वींत सर्व प्रकारें आपण पहिले होऊं। पहिलें राहण्याची स्वयंभू योग्यता आपल्यांतच आहे, पण आपण आपलेपण—आपलें आत्मरूप—विसरलों आहोंत, व मायेच्या जाळ्यांत पडलों आहोंत. मायाजाळ तोडून शक्तिबळ, युक्तिबळ व भक्तिबळ हीं ज्यांच्या ठिकाणीं एकवटलीं आहेत त्या आपल्या प्राणभूत मारुतिरायाची ' कायावाचा मनोभावें ' उपासना आपण करूं या म्हणजे ते आपले गुण आपणांस देतील.

१ मारुतीची उपासना सर्वजातींच्या तरुणांना करितां येते. सकाळ-संध्याकाळ पचेल तितकी तालीम करावी; कुस्ती, मलखांब, जोर, दंड बैठका

काढाव्यात; सूर्याला नमस्कार घालावेत, व मारुतीचें ध्यान करावें. मारुतीची मूर्ति ताइतांत घालून ताईत उजव्या दंडाला बांधावा, आणि लढाईस जावें, म्हणजे शत्रु समोर टिकणार नाहींत. मारुतीच्या उपासकाला कसलीही रोगराई होत नाहीं, त्याला अपजयाची भीति नाहीं, त्याला परशत्रु कसलीही पीडा करूं शकत नाहींत. जोरदार वाणीनें समर्थांची भीमरूपी स्तोत्रें घडघडाटानें पाठ म्हणावीत. ' वारितों दुर्घटें मोठीं । संकटीं धावतो त्वरें. ' असा धर्मसंस्थापनेसाठीं शत्रूंना हस्तभार, दंडभार, पुच्छभार देणारा बलभीम नेहमीं आपल्या संन्निध आहे अशी बळकट श्रद्धा ठेवावी. मारुतीच्या रागकर्कश कोपमुद्रेचें चिंतन करावें, मारुतीचें पुच्छकेंन कालचक्राप्रमाणें लंकेवरून करीत फिरत आहे याचें ध्यान करावें, बजरंगबलीचें ध्यान करितांना दगडाला आपलें शरीर पत्थरासारखें बळकट कसें होईल याचें मनन करावें. मारुतीचें ध्यान करितां करितां मी असाच वज्रदेही होईन असें नेहमीं इच्छित असावें. मारुतीसारखें चपळ व्हावें, गिरिकंदरें, दऱ्याखोरीं, डोंगरगड, सहज धांवतां धांवतां आपलीशीं करावीं. ऊनतान थंडीवारा यांना जुमानूं नये. लोखंड पचवून भस्म करावें. मारुतीसारखें शुद्ध ब्रम्हचर्य पाळावें. रामचरित्राचें ध्यान करावें. नामस्मरणाचा सपाटा चालवावा, म्हणजे कामक्रोधादि दुष्ट दुर्बळ होऊन जातात. समर्थ सांगतात—

मुखीं राम त्या काम बाधूं शकेना ।
गुणीं इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना ॥
हरीभक्त तो शत्रुकामासि मारी ।
जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी ॥ १ ॥

मारुतीचीं स्तुतिस्तोत्रें गर्जून म्हणावींत. अभंग, पदें, आरत्या यांचा रोज एक तरी पाठ ठेवावा. मारुतीला आळवावें, आपलेसें करावें व तीनही बळें संपादून त्यांचा राष्ट्रकार्यार्थ व्यय करावा. बोला बजरंग बली की जय!

| | | |
|---|---|---|
| पुणें, ममुक्षु कचेरी.<br>श्रीरामजयंती शके १८१०. | } | संतदास<br>लक्ष्मण रामचंद्र पांगारकर. |

# श्री मारुतिरायाचें चरित्र.



**मनोजवं मारुततुल्यवेगं । जितेंद्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ॥**
**वातात्मजं वानरयूथमुख्यं । श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ॥ १ ॥**

१ श्री मारुतिरायाचा जन्म केसरीनामक महाप्रतापी वानरापासून त्याची स्त्री जी महासती अंजना हिच्या पोटीं झाला. हा वायुदेवाच्या प्रसादानें झाला म्हणून याला वायुपुत्र, मारुति, असें म्हणतात. अंजनी ऋष्यमूक पर्वतावर कडक तपश्चर्या करीत होती, ध्यानधारणादिकांत ती फार निष्णात होती, व तिला शिवाची मोठी भक्ति होती. दशरथराजानें पुत्रकामेष्टियज्ञ केला, तेव्हां यज्ञनारायणानें प्रसन्न होऊन जें पायसपात्र दशरथस्त्रियांसाठीं दिलें, त्यांतला एक भाग घारीनें उडविला व तो वायुदेवानें नेमका अंजनीच्या हातांत आणून टाकला! अंजनीनें शिवस्मरण करून तो तात्काळ भक्षिला. वायुदेवाचा वेग, अग्निनारायणाची तेजस्विता, व महारुद्राचें दुष्टसंहारकत्व, हे तीनही गुण देवांच्या प्रसादानें अंजनीच्या पवित्र गर्भाला प्राप्त झाले. 'शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं' या सिद्धांताप्रमाणें आईचें तप फळास आलें,

निच्या पोटीं चैत्र शुद्ध पौर्णिमेला सूर्योदयीं या अपरसूर्याचा जन्म झाला. पितरांचें तप आणि देवताप्रसाद यांच्या संयोगाशिवाय असा भास्करासारखा महाप्रतापी पुत्र निपजणें अशक्य आहे.

२ मारुतिरायानें जन्मतांच तीनशें योजनांचें उड्डाण केलें व पक्वफळ समजून सूर्यमंडळाला तो कवळूं लागला! 'मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात' ही म्हण अगदीं खरी आहे. वाल्मीकिमुनि ( उत्तरकांड अ. ३५ ) म्हणतातः—

**बालार्काभिमुखो बालो बालार्क इव मूर्तिमान् ।**
**गृहीतुकामो बालार्कं प्लवतेंबरमध्यगः ॥ २४ ॥**
**नाप्येवं वेगवान्वायुर्गरुडो न मनस्तथा ।**
**यथायं वायुपुत्रस्तु क्रमतेम्बरमुत्तमम् ॥ २६ ॥**

बालसूर्यासारख्या या प्रतापी बालानें बालसूर्याकडे टक लाविली, व आकाशमंडळांत उड्डाण केलें. वायु, गरुड व मन यापेक्षां या वातपुत्राचा वेग फार प्रचंड वाढला. वायुपुत्र वायलाही आवरेनासा झाला. 'तमनुप्लवते वायुः प्लवन्तं पुत्रमात्मनः' मारुतापुढें मारुतीनें धांवावें. 'बापसे बेटा सवाई' झाला तरच जन्मास आल्याचें सार्थक! हा बालवानर थोरांचा अतिक्रम करील म्हणून इंद्रानें याच्या अंगावर वज्र टाकलें, तें याच्या हनुवटीला निसटून गेलें. हनुही दुखवली व वज्राचाही चूर झाला! तेव्हांपासून मारुतीला हनुमंत असें नांव मिळालें. देवांनीं मारुतीला स्तुतिस्तोत्रांनी प्रसन्न केलें, व 'तूं अवध्य व अजिंक्य होशील, शस्त्रास्त्रप्रवीण होशील, उत्तम वक्ता, व राजनीतिकुशल होशील' अशा प्रकारचे वर* दिले. 'अमित्राणां भयकरो मित्राणामभयंकरः' असा मारुतीचा दंडक चालूं लागला. त्यानें लीलेनें प्रचंड झाडें उपटावींत, मोठाले पर्वत चेंडूसारखे उडवावेत, व आकाशमंडळ हाच तालमीचा आखाडा समजून प्रचंड उड्डाणें करावींत. त्याला वज्रांग—बज्रांग—बजरंग म्हणतात.

---

* वेगवंत मारुतसरिस, बुधिबल रूपनिधान ।
एवमस्तु कह ऋषि ठाये, केशरि सुनि सुख मान ॥ १ ॥ तुलसीदास

' बजरंग बली की जय ' असा मनापासून जयघोष करणाऱ्या तालीमबाजांना मारुतिराय आयुरारोग्ययश देतो.

३ मारुतीनें सुग्रीवाशीं स्नेह जोडला. मारुतिराय फार बुद्धिमंत, बलिष्ठ, व सलामसलत देण्याच्या कामीं फार निःस्पृह व निर्भीड होते. ते ऋष्यमूक पर्वतावर राहात असतांना सीतादेवीचा शोध करीत रामलक्ष्मण पंपातीरावर आले. तेव्हां त्यांचा शोध करण्यास सुग्रीवानें मारुतीस पाठविलें. तेव्हां मारुतीनें फार युक्तीचें व मनोहर भाषण करून रामाचें मन मोहिलें व त्याचा सुग्रीवाशीं अग्निसाक्षिक स्नेह जमवून दिला. हा प्रसंग ( किष्किंधाकांड ३।४ ) प्रत्येकानें अवश्य वाचावा म्हणजे मारुतिरायांच्या हृदयहर्षी वक्तृत्वाची यथार्थ कल्पना होईल. ' अल्पाक्षर, असंदिग्ध व अस्खलित ' अशा त्यांच्या वक्तृत्वाचें खुद्द रामरायाला मोठें कौतुक वाटलें आहे ! मारुतीनें आपल्या स्कंधावर रामलक्ष्मणांना सुग्रीवाकडे नेलें. रामानें वालीस मारून सुग्रीवाला राज्याभिषेक केला. सुग्रीव आनंदित होऊन चार महिने विषयसुखानुभवांत पूर्ण रंगून गेला.

४ रामसुग्रीवांचें सख्य होऊन असें ठरलें होतें कीं, रामानें वालीला मारून सुग्रीवाला राज्याभिषेक करावा व सुग्रीवानें सीतादेवीचा शोध करून, रावणनिर्दाळणाच्या कामीं रामास साह्य करावें. या ठरावाप्रमाणें रामानें आपली कामगिरी उत्तमप्रकारें केली, पण अपूर्व व निष्कंटक राज्यसुखाचा अनुभव मिळतांच तारेच्या संगतींत रंगून सुग्रीव मात्र आपल्या कर्तव्यास विसरला. रामचंद्राला साहजीकच कोप आला व त्यानें सुग्रीवास शासन करण्यासाठीं लक्ष्मणास पाठविलें. अशा प्रसंगीं मारुतिरायांनें खऱ्या मुत्सद्याचें व निष्कपट अशा सन्मित्राचें उत्तम कार्य केलें. लक्ष्मण क्रोधताम्राक्ष होऊन वानरांस भिववीत व चिडवीत सुग्रीवनगरींत शिरला. इकडे मारुतीनें निर्भीड व निर्भय होऊन सुग्रीवाला* जागें केलें व:—

* अध्यात्मरामायण. किष्किंधाकांड. सर्ग. ४

**रामेण ते कृतः पूर्वमुपकारो ह्यनुत्तमः ।**
**कृतघ्नवत्त्वया नूनं विस्मृतः प्रतिभासि मे ॥ ४५ ॥**
**त्वद्वागमनमेकाग्र ईक्षते कार्यगौरवात् ।**
**त्वं तु वानरभावेन स्त्रीसक्तो नावबुध्यसे ॥ ४७ ॥**

या प्रमाणें त्याची स्पष्ट व जोरदार शब्दांनीं कानउघाडणी केली व त्याजकडून सीताशोधार्थ पाठविण्यासाठीं प्रचंड वानरसेना तयार करून ठेवली. लक्ष्मण डोळे फाडीत येतो आहे तोंच हंसत हंसत व त्याला तारेचा महाल, अंगदाचा वाडा, प्रेमळ शब्दांनीं दाखवीत दाखवीत मारुतीनें त्याला सुग्रीवाच्या महालापाशीं आणले! ' हे चांडाळा! रामाला तूं इतक्यांत विसरलास काय? ' अशा कठोर शब्दांनीं लक्ष्मण सुग्रीवावर उसळतो आहे तोंच*:—

**उवाच हनुमान्वीरः कथमेवं प्रभाषसे ।**
**त्वत्तोऽधिकतरो रामे भक्तोऽयं वानराधिपः ॥ ५४ ॥**
**रामकार्यार्थमनिशं जागर्ति न तु विस्मृतः ।**
**आगताः परितः पश्य वानराः कोटिशः प्रभो ॥ ५५ ॥**

या प्रमाणें मारुतिरायांनीं उत्तम राजकारण करून आपापसांतला कलह मिटविला! सुग्रीवाला आंच कमी होती, लक्ष्मणाला जास्त होती; सुग्रीव सुखासीन झाला होता, लक्ष्मण उपासतापासांत दिवस कंठून तीव्र तपाचरण करीत होता; सुग्रीवाची रामभक्ति परिस्थितीच्या उपाधीमुळें निद्रित झाली होती, लक्ष्मणाची रामभक्ति पूर्ण जागृत झाली होती; असा उभयतांत भेद होता! तथापि बुद्धिमंतांमध्यें वरिष्ठ असे जे मारुतिराय त्यांनीं मवाळ व जहाल अशा या उभय वीरांचा समेट करून उभयतांचा सामान्य शत्रु जो प्रजापीडक रावण त्यांशीं त्यांस युद्ध करावयास नेलें!! मारुतीचें युक्तिबळ असें लोकोत्तर होतें. त्याच्या युक्तीबळाच्याच जोडीचें त्याचें लोकोत्तर वक्तृत्व होतें. वाल्मीकि याच प्रसंगाच्या मारुतीच्या वक्तृत्वासंबंधानें म्हणतात§:—

---

* सदर. सर्ग ५ § कि. अ. २९.

**हितं तथ्यं च पथ्यंच सामधर्मार्थनीतिमत् ।**
**प्रणयप्रीतिसंयुक्तं विश्वासकृतनिश्चयम् ॥ ८ ॥**

५ समुद्रोल्लंघनाचा समय प्राप्त झाला तेव्हां १०० योजनें समुद्रावें उड्डाण करून सीताशोध लावून कोण परत येईल असें अंगदानें विचारिलें. तेव्हां कोणी म्हणाला मी १० योजनें जाईन, कोणी म्हणाला मी २० जाईन, याप्रमाणें होतां होतां जांबवान् म्हणाला मी ९० योजनें जाईन व अंगद म्हणाला मी १०० योजनें उडून जाईन, पण माझ्यानें परतवणार नाहीं! इतक्यांत जांबुवानाला मारुतीचें स्मरण झालें व तो परमोत्साहानें गर्जून म्हणालाः—

**हा तनय मारुताचा, याच्या ऐका अपार वीर्याला ।**
**भक्षित होता परिणतफलमतिनें*उपजतांचि सूर्याला ॥ १३५**
**याचे भुजदंड महाप्रचंड यमदंड दंडदक्ष महा ।**
**हा वज्रदेह केवळ सुरशत्रुपराजयप्रद क्षम हा ॥ १३८ ॥**
**हा विजयवीर्यशाली, दुर्धर, दुर्धर्ष, सर्ववीरमणी ।**
**लंघुनि नदीपतीतें शोधील नृपालसूनुची रमणी ॥ १४९ ॥**

—मोरोपंत. मंत्र रामायण.

या जांबवंताच्या उत्साही वाणीनें मारुतीला स्वपराक्रमाचें स्मरण झालें; त्यानें ब्रह्मांड भेदणारा सिंहनाद केला, व रामाचें नांव घेऊन उड्डाण केलें! व मध्यें आलेल्या अडचणींतून युक्तीनें पार पडून परतीरावर जाऊन पोंहचला.

६ मारुतिरायांनीं लंकेंत सीतादेवीचा शोध लावून तिला रामवृत्त सांगितलें व राममुद्रिका दिली. आणि लंकेची होळी करून सीताशोधाचें आनंददायक वृत्त सांगण्याकरितां उड्डाण करून ते परत वानरसेनेंत आले, ह्या गोष्टींच्या वर्णनाला रामायणांत 'सुंदरकांड' असें यथार्थ नांव दिलेलें आहे. वाल्मीकिरा-

* पक्व फळ असें समजून. ‡देवांचे शत्रु जे राक्षस त्यांचा पराजय करणारे. †रामभार्या.

मायणांत लंकेचें बहारीचें वर्णन दिलें आहे. तेहतीसकोटि देवांना बंदींत टाकून साम्राज्याचें राजसी ऐश्वर्य भोगणाऱ्या व मदोन्मत्त होऊन अधर्म आणि अनीति यांचे जोरावर जगत्पीडा करणाऱ्या जगत्कंटक रावणाच्या नगरींत मारुतिरायानें सूक्ष्मरूपानें प्रवेश केला. सर्व लंका व तीतील वाडे त्यानें धुंडाळले, पण कोठें सीतादेवींचा शोध लागला नाहीं. तेव्हां ' सीता सागरे निमग्ना वा भक्षिता वा ता वा मृता वा ' असा संशय येऊन त्यांचें चित्त संशयित झालें. सीताशोध न करितां परतण्यांत बिलकूल पुरुषार्थ नाहीं असें मनांत येऊन तो विषण्ण झाला. पण उत्साहवंत वीराच्या हृदयांत विषादाला जागा मिळत नाहीं! त्यानें अशोकवनिकेंत सीतेला शोधून काढलें. शिंशपा—( शिसवी )-वृक्षाखालीं त्यानें एकवेणी, उपवासानें दीन झालेली, दुःखित व रामचिंतनमग्न अशी सीता पाहिली. तुळसीदास म्हणतातः—

दोहाः-तब हनुमंत कही सब रामकथा निजनाम।
सुनत युगलतनु पुलकि अति, मगन सुमिरि गुणग्राम॥६॥
कपिबरवचन सप्रेम सुनि, उपजा मन विश्वास।
जाना मन क्रम-बचन यह, कृपासिंधुकरदास॥ ९॥
देखि बुद्धि बल निपुण कपि, कहा जानकी जाहु।
रघुपतिचरण हृदय धरि, तातमधुर फल खाहु॥ १६॥

मारुतीनें रामाची हकीकत सांगितली, तेव्हां रामभक्तीनें सीता व मारुति या उभयतांचीं अंतःकरणें भरून येऊन त्यांच्या अंगावर सात्विक रोमांच उभे राहिले; व ते रामस्मरणाबरोबर रामाच्या गुणध्यानांत मग्न झाले. मारुतीचे प्रेमळ भाषण ऐकतांच सीतेच्या मनांत त्याविषयीं विश्वास उत्पन्न झाला व हा दयासमुद्र रामाचा मनांतून खरा भक्त आहे हें तिनें ओळखिलें. मारुतीची बुद्धि, मारुतीचें शरीरबळ व मारुतीची चतुरस्रता पाहून सीता ह्मणाली, ' बाळा! आतां जा, रघुपति चरणांचें चिंतन करीत जा. वनांतील मधुर फळें खाऊन विश्रांति घे. ' सीतेची रामभक्ति व पातिव्रत्य पाहून व राव-

णाला तिनें अंगच्या पातिव्रत्यानलाच्या जोरावर धिःकारलेली पाहून मारुतीचा निश्चय झाला कीं, रावणादि राक्षसांचा संहार करण्याकरितां अवतरलेल्या रामप्रभूची सीतादेवी ही आदिशक्ति होय. सीताराम हे आपले आईबाप होत अशा शुद्धभावनेनें मारुतीचें हृदय निरंतर रंगलेलें असे. रामभक्तांत मारुतीच श्रेष्ठ होय असें समर्थही म्हणतात. रामानें ओळखीसाठीं दिलेली मुद्रिका त्यानें सीतेजवळ दिली व सीतेपासून रामास देण्याकरितां चुडामणि मागून घेतला. अशोकवनांतलीं मधुर फळें खाऊन तो यथेच्छ पाणी प्याला. सीताशोधाचें आपलें मुख्य कार्य झालें असें मारुतीस वाटलें, तथापि कांहीं तरी अधिक कामगिरी करून दाखविल्याशिवाय परत जाणें योग्य नाहीं असें त्या चतुरशिरोमणीस* वाटलें:—

> कार्यार्थमागतो दूतः स्वामिकार्याविरोधतः ।
> अन्यत्किंचिदसंपाद्य गच्छत्यधम एव सः ॥ ६९ ॥

मारुतीनें सीतेनें आश्रयिलेला वृक्ष सोडून सारी अशोकवनिका उध्वस्त केली, सहस्रस्तंभांवरचा भव्य राजवाडा जाळून टाकला, सर्व रक्षकांस ठार मारले, किंकर नांवाचे ८० हजार राक्षस मारुतीच्या अंगावर आले त्या सर्वांस या एकाकी वीरानें आपल्या प्रचंड गदेच्या तडाख्यांनीं धुळींत लोळविलें. रावणाचे पांच सेनापति आणि रावणाचा पुत्र अक्ष ( अखया ) या सर्वांस त्यानें यमसदनास पाठविलें ! इंद्रजितानें ब्रह्मास्त्रप्रयोगानें ( मारुतीनें बांधू दिल्यामुळें ) त्यास बांधून रावणासन्मुख रावणदरबारांत‡ नेलें. मारुतीलाही तेंच पाहिजे होतें. इंद्रजितानें यथार्थ मारुतिपराक्रमाची स्तुति करून रावणास सांगितलें† कीं:—

---

* अध्यात्मरामायण. सर्ग. ‡ वाल्मीकिरामायण. अ. ४१—४७ पहा.

† अध्यात्मरामायण सर्ग ४.

**यद्युक्तमत्रार्थ विचार्य मंत्रिभि-**
**र्विधीयतामेष न लौकिको हरिः।**

" मंत्रिमंडळाचा योग्य सल्ला घेऊन योग्य तें विचारानें करा कारण हा वानर सामान्यांतला नाहीं. '' मारुतीनें आपलें अलौकिकत्व उत्तम प्रकारें सिद्ध करून दाखविलें. तूं कोण आहेस ह्मणून विचारतांच ' मी सुग्रीवाचा दूत व रामाचा सेवक आहे ' असें त्यानें सांगितलें. ' तूं वनभंग कां केलास ? ' या प्रश्नाला ' एरवी रावणाचें दुर्लभ दर्शन झालें नसतें ' असें त्यानें उत्तर दिलें ! ' तूं राक्षसांना कां मारलेस ! ' या प्रश्नावर आत्मसंरक्षणाचा ईश्वरी कायदा माहीत असलेल्या या ईश्वरनिष्ठानें ' रक्षणार्थंच देहस्य ' असा खडखडीत जबाब दिला! ' एवढें बळ कोठून आलें ! ' या प्रश्नावर रावणाशीं आपलें समत्व सुचवून ' पितामहादेष वरो ममापिहि समागतः ' असें तो ह्मणाला. ' तुला असा वर मिळाला आहे, तर मग बंधन कां पावलास ! ' या प्रश्नास त्यानें ' ज्या ब्रह्मास्त्रानें मला बांधलें त्याचा मान रहावा व तुला पाहावें ह्मणून ! ' हें उत्तर दिलें यावर ' मला भेटण्याचा हेतु काय ! ' असें रावणानें विचारतांच ' कांहीं तशाच महत्वाच्या रामकार्यार्थ मी आलों आहें ' असें सांगून मारुतीनें त्यास सुग्रीवाचा निरोप कथन केला व रामाचा योग्य सल्लाही दिलाः—

**तद्भवान्दृष्टधर्मार्थस्तपःकृतपरिग्रहः ।**
**परदारान्महाप्राज्ञ नापरोद्धुं त्वमर्हसि ॥ १७ ॥**
**नहि धर्मविरुद्धेषु बव्हपायेषु कर्मसु ।**
**मूलघातिषु सज्जन्ते बुद्धिमन्त भवद्विधाः ॥ १८ ॥**
**तत्त्रिकालहितं वाक्यं धर्म्यमर्थानुयायिच ।**
**मन्यस्व नरशार्दूल! जानकी प्रतिदीयताम् ॥ २१ ॥**

**याचा अर्थः**—" हे महाप्राज्ञा ! तूं धर्मार्थतत्व जाणणारा आहेस! तपोबळामुळें धनधान्यादिकांची तुजपाशीं समृद्धि झाली आहे. तुला सांगा-यचें एवढेंच कीं परस्त्रीचा अभिलाष तूं सोडून दे! सद्धर्माला सोडून असल्यामुळें

अनर्थावह असलेल्या व घरादारांची पाळेंमुळें ह्मणून टाकणाऱ्या दुष्कर्माच्या ठिकाणीं तुझ्या सारखे सुबुद्ध प्राणी आसक्त होत नाहींत. ह्मणून विचार करून जानकीस परत दे. हा माझा बोध धर्म्य आहे, अर्थानुयायि ह्म० नीतिशास्त्राला धरून आहे, व त्रिकालहित आहे ह्म० या प्रमाणें तूं वागलास तर राम तुला पूर्वापराधाची क्षमा करितील, तुझ्या विद्यमान ऐश्वर्याची हानी होणार नाहीं व भावि अरिष्ट टळेल!!" मारुतिराया-या अप्रतिम वक्तृत्वाचा हांही एक उत्तम मासला आहे. ( वाल्मीकि रामायण. सुंदरकांड अ० ५०।५८ पहा. ) मारुतिराय परराज्यांत अशी शिष्टाई करायला गेले तेव्हां दोन गोष्टींची त्यांजपाशीं जय्यत तयारी होती. एक, शिष्टाईचे काम सलोख्यानें झालें नाहीं तर लागलेंच युद्धकांडाला आरंभ करण्यासाठीं प्रचंड वानरसेना परतीरावर सज्ज होऊन बसली होती! दुसरें, मारुतीचा आत्मविश्वास प्रचंड होता. तो अनादर व अपमान लेशमात्र सहन करणारा नव्हता. शत्रूंचीं हाडें नरम करण्याचें त्याचें सामर्थ्य लोकोत्तर होते, ह्मणूनच त्यानें रावणास बजावलें, कीं " तूं हा सद्बोध ऐकणार नाहींस, तर 'साश्वरथकुंजर' अशा लंकेची मीं एकटा होळी करून टाकीन! तुझे मित्र, मंत्री, ज्ञाती, भाऊ, सुत, हितकर्ते या सर्वांना भस्म करण्याचें सामर्थ्य माझ्या रामाच्या बाणांत आहे!" स्वजनांचा पाठिंबा, आत्मविश्वास, व लढाईची पूर्वतयारी या साधनत्रयींशिवाय जे जे शिष्टाई करण्यास सज्ज होतात ते ते शत्रूच्या उपहासास व थट्टेस पात्र होतात! असो. रावणाचा विनाशकाळ समीप आला असल्यामुळें त्याला हा सद्बोध रुचला नाहीं. त्यानें मारुतीचें शेपुट जाळण्याचा हुकूम केला. काळचक्राप्रमाणें शत्रुराज्यांत अव्याहत फिरून सर्वांचीं घरेंदारें जाळणारें तें शेंपूट उलट रावणनाशास मात्र अधिकच कारण झालें! राक्षसांनीं शेंपटीला वस्त्रें गुंडाळून त्यावर तेलाचे बुधले ओतले व तें पेटवून दिलें. मारुतीचें कामच झालें! त्यानें राक्षसांना शेंपटानें बडवलें, जाळले, पोळले, झोंकून दिले, व अवशिष्ट राहिलेले वाडे जाळून लंकेची रक्षा केली! साम्राज्यमदानें धुंद झालेले राजे मारुतीच्या शेंपटाला भिऊन वागतील तर कांहीं वर्षे टिकतील! असो. लंकादहन करून मारुतिराय सीतेची आज्ञा घेऊन निघाले व एकाच उड्डाणासरसे वानरसेना होती त्या महेंद्र पर्वतावर उत्सुक असलेल्या स्वजनांस येऊन भेटले. सर्वांनीं 'बजरंगबली कीं जय' म्हणून त्याचा जयजय-

कार केला. सर्ववृत्त जांबवतानें मारुतितर्फे रामादिकांस निवेदन केलें. सर्वांसच मोठा हुरूप चढला. मारुतीनें सीताशोध लाविला, व लंकेची होळी केलीच, पण याहून एक महत्कार्य केलें. राक्षस देवमानवदानवांना अजिंक्य होऊन राहिले होते, त्यांच्या अंगाला हात लावण्याची, त्यांजकडे वांकड्या मानेनें पाहण्याची, त्यांच्यावर चाल करून जाण्याची, व त्यांच्याशीं युद्धप्रसंग करण्याची कल्पनाही नष्ट झाली होती. लंकेचे राक्षस म्हणजे मानवांना खाण्याकरितां जन्मलेले आहेत अशी राक्षसांनीं आपल्या अमानुष कृत्यांनीं मानवांची समजूत करून टाकली होती, व यामुळें राक्षसांच्या ठिकाणीं घमेंड व मानवांच्या ठिकाणीं बावळेपणा हे विरुद्ध गुण उत्पन्न झाले होते. मारुतिरायांनीं हें पारडें पार फिरवून टाकलें. त्यांनीं एकट्यांनीं अद्भुत शक्तिबळाच्या प्रचंड जोरावर हजारों राक्षसांना धूळ चारली. राक्षस वानरांना भिऊं लागले व वानर राक्षसांना भेडसावूं लागले ! काळ फिरला, राक्षसांची सत्ता अस्तास जाऊं लागली.

६ यानंतर युद्धकांडास आरंभ झाला. रामरावणांचें युद्ध सर्वांस ठाऊक आहेच, त्याचा विस्तार मी करीत नाहीं. वानरांनीं पांच दिवसांत सेतु बांधला, व वानरसेनेची धाड लंकेवर येऊन पडली. बिभीषणाचा रावणानें अपमान केल्यामुळें व राम परमेश्वरावतार आहे हें त्यास समजल्यामुळें तो रामाश्रयास आला. रामादिकांस विचार पडला. कोणी सांगितलें 'हा शत्रुपक्षाकडील असल्यामुळें यास येथेंच ठार मारा.' कोणी म्हणाले यावर विश्वास न ठेवतां यास सोडून द्या.' असे दहांचे दहा विचार पडले. मारुतिरायानें सांगितलें कीं, "रावणापेक्षा रामाचें सामर्थ्य अधिक आहे अशी याची वालिवधापासून खात्री झाली आहे, याच्या ठिकाणीं दुष्टभाव दिसत नाहीं, व याचें वदन निष्कपट दिसतें तरी याचा संग्रह करावा.' या प्रमाणें रामानें बिभीषणाचा संग्रह केला. अंगदशिष्टाई निष्फळ झाल्यावर युद्धारंभ झाला. हनुमंतानें पहिल्या दिवशीं जंबुमालीशीं द्वंद्वयुद्ध करून त्यास ठार मारिलें; दुसऱ्या दिवशीं रावणसचिव धूम्राक्ष यास मारिले; चवथ्या दिवशीं अकंपनादि राक्षसांस मारिले, साहवे दिवशीं रावणानें ब्रह्मदत्तशक्ति लक्ष्मणावर टाकली असतां लक्ष्मण मूर्छित होऊन पडला, तेव्हां त्यास लंकेंत नेण्यासाठीं रावण उचलून नेत असतां मारुतिरायानें रावणाच्या मस्तकावर असा भयंकर प्रहार केला कीं रावण भूमीवर उताणा पडला व भडभडां रक्त ओकीत मुर्च्छा येऊन पडला ! मारुतीनें लक्ष्मणास उच-

लून रामासमीप नेलें, रामानें रावणाचा मुगुट छेदून पाडला .( वाल्मीकिरामायण, युद्धकांड, अ. ५९. ) याच दिवशीं कुंभकर्णास रावणानें उठविल्यावर तो युद्धांत रामाच्या हातून मरण पावला. सातव्या दिवशीं रावणाचे पुत्र व सापत्न भ्राते पतन पावले. आठव्या दिवशीं इंद्रजित् अदृश्य रुपानें युद्धास आला, त्यानें अल्पकाळांतच ६७ कोटि वानरांस ठार मारिले व तो रामलक्ष्मणांस मूर्छित पाडून गेला. ( अ. ७३ ) तेव्हां जांबवंताच्या सूचनेवरून हिमालयाच्या ऋषभनामक शृंगावरील दिव्यौषधी मारुतीनें आणल्या. रामलक्ष्मणांसह वानरसेना पुन्हां जिवंत झाल्या. अखेरच्या ह्मणजे दहाव्या दिवशीं लक्ष्मणाचें इंद्रजिताशीं घनघोर युद्ध होऊन इंद्रजित् पडला, तेव्हां लंका शून्य दिसूं लागली. अखेर वानर व राक्षस यांच ' न भूतो न भविष्यति ' असें युद्ध झालें. ' कांपे धरा धरागं, गिरि चरती, अब्धि होय संक्षुब्ध. ' मांसांचे ढीग पडले व रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. रावण रामाच्या हातून पडला. या रामरावणयुद्धांत, किंबहुना सर्व रामायणकथानकांत मारुतीचे पराक्रम, मारुतीची मसलत, यांचीच योग्यता सर्वाधिक आहे, इतकेंच काय पण रामभक्त मोरोपंत यांनीं ह्मटल्या मार्णे:

> बा ! त्वत्पराक्रमाविण, सहसा येतो न खळवळें वळणी ।,
> श्रीमद्रामायणरस रसिकांला स्पष्ट लागता अळणी ! ॥ १ ॥

७ युद्ध संपलें. देवांनीं रामावर पुष्पवृष्टि केली. 'मरणांताणि वैराणि' हें उदार तत्व सांगून रामानें बिभीषणाकडून रावणादिकांची क्रिया करविली. बिभीषणाला राज्याभिषेक करण्याची लक्ष्मणास आज्ञा देऊन रामानें मारुतिरायाला आवडीचें काम सांगितलें ! रावणवधाची बातमी मारुतीनें स्वतः सीतेस सांगितली ! तिच्या प्रेमानंदास भरती आली, व ती रामदर्शनासाठीं अत्यंत्सुक झाली. बिभीषणानें तिला मंगलस्नान घालून शिबिकेंतून वानरगणांच्या जयघोषांच्या प्रेमळ आरोळ्यांतून रामाकडे आणलें. दिव्य झालें. बिभीषण, सुग्रीव, अंगद यांसह भरतभेटीला उत्सुक होऊन, राम अयोध्येकडे वळले. पुष्पक विमानांतून राम सीतेला हा सुवेलपर्वत, ही युद्धभूमि, हा सेतु, हा रामेश्वर, हा महेंद्र पर्वत, ही किष्किंधा नगरी, हा ऋष्यमूक पर्वत, हें पंपासरोवर, हा शबरीचा आश्रम, ही पंचवटी, ही गोदावरी, या प्रमाणें पूर्वचारित्रानें पावन झालेलीं स्थळें दाखवीत चालले. व अंजनीच्या तपश्चर्येच्या डोंगराजवळ येतांच पुष्पक विमान थबकलें. रामादिकांनीं अंजनीला नमस्कार केला व

तिच्या पाशीं माझी स्तुति करूं नका असें मारुतिरायानें मुद्दाम सांगित असतांही रामरायास राहवलें नाहीं! मारुतिपराक्रम ऐकतांच त्या वीरमातेल आपल्या पोरानें कांहींच केलें नाहीं असें वाटून उलट वाईट वाटलें. ' माझ दुधाची हे प्रौढी। कळिकाळाची नरडी मुरडी। रावणादिक हीं बापुडीं।घुंघुरट जेथें!' अशी ती वीरसूची गर्जना ऐकून मारुतिरायासारख्या अद्वितीय रत्नाल प्रसविणारी ही अंजनी धन्य धन्य धन्य–त्रिवार धन्य–असेंच रामरायाला वाटलें सदर गोड प्रसंगावर राष्ट्रीय शिक्षणाचें खरें महत्व जाणून राष्ट्रांत वीरमातांच्य तोंडीं वीररसानें ओथंबलेलें उत्कृष्ट गीत असावें म्हणून श्री समर्थांन मुद्दाम ' अंजनी गीत ' तयार केलें आहे! तें आम्ही पुढें दिलेंच आहे. वेदांनं मुनींनी गायिलेल्या रामरूप परमात्म्यानें मारुतिरायाचें स्वमुखानें गौरव केलें याहू अधिक भाग्य तें कोणतें! श्री रामरायानें मारुतीस दिलेलें प्रशस्तिपत्र पहाः—

शौर्यं दाक्ष्यं बलं धैर्यं प्राज्ञता नयसाधनम्।
विक्रमश्च प्रभावश्च हनूमति कृतालयः॥ १॥

८ असो. रामराय सर्वांसह अयोध्येस जाऊन पोहोंचले. मारुतिराय निरंतर त्यांच्या संन्निध असत. गुहाला व भरताला रामागमनानंदाची अमृतवार्ता सांगण्याच्या कामावर प्रभूनें मारुतिरायाचीच योजना केली होती. अभिषेकाचा सोहळा सर्वांबरोबर मारुतिरायांनीं पाहिला. रामावताराचें मुख्य कार्य आटोपलें. मारुतिरायांनीं अविप्लुत ब्रह्मचर्य, निस्सीम रामभक्ति, वरिष्ठ प्रकारची बुद्धिमत्ता, विशुद्ध मित्रत्व, लोकोत्तर पराक्रम, धर्मसंस्थापनेसाठीं दुष्टमर्दनसामर्थ्यं वगैरे अद्भुत गुणांचा ठसा भारतीयांच्या अंतःकरणावर कायमचा उठविला आहे. रामरायान मारुतिरायाला ब्रह्मविद्या दिली व आम्हां जड जीवांच्या उद्धारासाठीं चिरंजीव करून ठेवलें आहे. मारुतिरायांना जन्मजराव्याधि नाहींत, इतकेंच नव्हे तर ते आपल्या उपासकांना या सर्व दुःखांपासून मुक्त करितात. मारुतिराय प्रसन्न होऊन आम्हां भारतीयांमध्यें आपल्या वरप्रसादानें पावन व धन्य करून श्रीसमर्थरामदासस्वामीसारखा एखादा महापुरुष निर्माण करोत एवढीच त्यांची प्रार्थना करून आटपतो.

संतदास
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# श्री मारुति-उपासना.

## श्रीसमर्थरामदासकृत

## भीमरूपी स्तोत्रें

( १ )

भीमरूपी महारुद्रा वज्र[1]हनुमान मारुती ।
वनारी[2] अंजनीसूता रामदूता प्रभंजना ॥ १ ॥
महाबळी प्राणदाता सकळां ऊठवी बळें ।
सौख्यकारी शोकहर्ता धूर्त वैष्णव गायका ॥ २ ॥
दिनानाथा हरीरूपा सुंदरा जगदंतरा[3] ।
पाताळ[4]देवताहंता भव्य शेंदूरलेपना ॥ ३ ॥
लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना ।
पुण्यवंता पुण्यशीला पावना परतोषका ॥ ४ ॥
ध्वजांगें[5] ऊचली बाहो आवेशें लोटला पुढें ।
काळाग्नी काळरुद्राग्नी देखतां कांपती भयें ॥ ५ ॥

---

१ वज्राप्रमाणें बळकट हनुवटी असलेला. २ रावणाचें वन उध्वस्त करणारा. ३ भूतमात्रांच्या हृदयीं रहाणारा. ४ लंकेचा प्राण घेणारा. ५ ' ध्वजाग्रें '–पाठभेद.

ब्रम्हांडें माईली नेणों आवळे दंतपंगती ।
नेत्राग्नी चालिल्या ज्वाळा भ्रुकुटी ताठिल्या बळें ॥ ६ ॥
पुच्छ तें मुर्डिलें माथां किरीटी कुंडलें वरी ।
सुवर्ण कटिकासोटि घंटा किंकिणि नागरा[1] ॥ ७ ॥
ठकारे[2] पर्वताऐसा नेटका सडपातळू ।
चपलांग पाहतां मोठें महाविद्युल्लतेपरी ॥ ८ ॥
कोटिच्या कोटि उड्डाणें झेंपावे उत्तरेकडे ।
मंद्राद्रीसारिखा द्रोणू[3] क्रोधें उत्पाटिला बळें ॥ ९ ॥
आणिला मागुति नेला आला गेला मनोगती[4] ।
मनासी टाकिलें मागें गतीशी तूळणा नसे ॥ १० ॥
अणूपासूनि[5] ब्रम्हांडा–एवढा होत जातसे ।
ब्रम्हांडाभोंवते वेढे स्वपुच्छें घालवूं शके ॥ ११ ॥
तयासी तूळणा कोठें ? मेरुमांदार धाकुटे, ।
तयासी तूळणा कैची ? ब्रम्हांडीं पाहतां नसे ! ॥ १२ ॥
आरक्त देखिलें डोळां गिळिलें सूर्यमंडळा ।
वाढतां वाढतां वाढे भेदिलें शून्यमंडळा[6] ॥ १३ ॥
भूतप्रेतसमंधादी रोगव्याधी समस्तही ।
नासती तूटती चिंता आनंदें भीमदर्शनें ॥ १४ ॥

---

१ सुंदर. २ ठाण घेऊन उभा राहतो. ३ मंद्राच्या बरोबरीचा द्रोणपर्वत. ४ मनाइतकी चंचलगति ज्याची असा. ५ अत्यंत सूक्ष्म व अत्यंत स्थूल. ६ आकाशमंडळाला भेदून जाणारा.

हे धरा पंधरा श्लोकीं लाभली शोभली भली[1] ।
दृढ देहो निसंदेहो संख्या चंद्रकळा[2]गुणें ॥ १५ ॥
रामदासीं[3] अग्रगणू कपिकुळासि मंडणू ।
रामरूपीं अंतरात्मा दर्शनें दोष नासती ॥ १६ ॥

## ( २ )

जनीं ते अंजनी माता जन्मली ईश्वरी तनू ॥
तनू मनू तो पवनू एकची पाहतां दिसे ! ॥ १ ॥
त्रैलोक्यीं पाहतां बाळें[4] ऐसें तो पाहतां नसे ! ॥
अतूळ तूळना नाहीं मारुती वातनंदनू ॥ २ ॥
चळे तें चंचळे नेटें बाळ मोवाळ[5] साजिरें[6] ॥
चळताहे चळवळी[7] बाळ लोवाळ[8] गोजिरें ॥ ६ ॥
हात कीं पाय कीं सांगों नखें बोटें परोपरी ॥
दृष्टीचें देखणें मोठें लांगूळ[9] लळलळीतसे ॥ ४ ॥

---

१ कोणाकोणाच्या ह्मणण्यांत यापुढें पुढील तीन चरण आहेत:—

पावती रूपविद्यादी स्तोत्रपाठें करूनियां ।
ऐसें हें स्तोत्रमाहात्म्य पठती जपती सदा ॥ १५ ॥
मारुतीच्या प्रसादानें भुक्ति मुक्ति सदा वसे ।

२ सोळा कला. ३ रामाचें दास्य करणाऱ्या सर्व रामभक्तांत श्रेष्ठ. ४ त्रैलोक्यांत असें बाळ दुसरें झालें नाहीं ! ५ मवाळ, मऊ. ६ सुंदर. ७ नेहमीं विजेप्रमाणें चळवळ करणारें. ८ मवाळ व साजिरें ह्मणजे शरीरानें सुकुमार व सुंदर, व लोवाळ व गोजिरें म्हणजे मनानें लव्हाळ्याप्रमाणें नम्र व उदार. ९ पुच्छ.

खडीखाडी दडे तैसा पीळ पेंच परोपरी ॥
उड्डाण पाहतां मोठें झेंपावे रविमंडळा ॥ ५ ॥
बाळानें गिळिला बाळू स्वभावें खेळतां पहा ॥
आरक्त पीत वाटोळें देखिलें धरणीवरी ॥ ६ ॥
पूर्वेसी देखतां तेथें उडालें पावलें बळें ॥
पाहिलें देखिलें हातीं गिळिलें जाळिलें बहू ॥ ७ ॥
थुंकोनी टाकितां तेथें युद्ध जालें परोपरी ॥
उपरी ताडिला तेणें एकु नामचि पावला ॥ ८ ॥
हो गिरी तो गिरी पाहे, गुप्त राहे तरूवरी, ॥
मागुता प्रगटे, धांवे, झेंपावे, गगनोपरी ! ॥ ९ ॥
पळही राहिना कोठें ! बळेंचि घालितां झडा ॥
कडाडां मोडती झाडें, वाडेवाडे उलंडती ! ॥ १० ॥
पवनासारिखा धांवे वावरे विवरें बहू ॥
अपूर्व बाळलीला हे, रामदास्य करी पुढें ! ॥ ११ ॥

---

१ मारुतीचें शरीर हीं नखें वांकडीं असें. २ ह्या बळानें बाळपणींच बाळसूर्य गिळिला. ३ मारुतीनें जन्मतांच तीनशें योजनांचें उड्डाण केलें व बाळसूर्याकडे चालला तेव्हां इंद्रानें त्यावर वज्र टाकलें व त्यामुळें त्याचा डावा हनु भग्न होऊन तो भूमीवर पडला. वायुदेव त्यामुळें रुष्ट झाला. तेव्हां इंद्रानें 'इतःपर माझ्या वज्रापासून याला भय व पीडा होणार नाहीं,' असें सांगितलें. या वेळेपासून मारुतीला 'हनुमान्' असें दुसरें नांव मिळालें. ४ पर्वतप्राय मारुती. ५ वाड ह्म मोठाले वाडे ह्म० इमारती याच्या उड्डाणामुळें कोसळून पडत. ६ फिरे, हिंडे. ७ गुहा दऱ्याखोरी. ८ समर्थ म्हणतात कीं, मारुतिरायाच्या या बाळलीलाच असल्या अद्भुत व लोकोत्तर आहेत; असें अद्भुत शरीरबळ त्यांच्या ठिकाणीं होतें म्हणूनच रामाचें दास्य–दुर्जननिर्दळणरूप व संतसंरक्षणरूप दास्य–त्यांच्या हातून झालें. **रामाचें दास्य करूं पाहणाराच्या अंगीं असें लोकोत्तर शरीरबल पाहिजे**

## ( ३ )

कोपला रुद्र जे काळीं ते काळीं पाहवेचिना ।
बोलणें चालणें कैंचें ? ब्रम्हेकल्पांत मांडला ॥ १ ॥
ब्रम्हांडाहूनि जो मोठा स्थूळ उंच भयानक ।
पुच्छ तें मुर्डिलें माथां पाऊल शून्यमंडळा ॥ २ ॥
त्याहून उंच वज्राचा सव्य बाहो उभारिला ।
त्यापुढें दूसरा कैंचा, अद्भूत तूळणा नसे ! ॥ ३ ॥
मार्तंडमंडळा ऐसे दोन्ही पिंगाक्ष ताविले ।
कर्करा घर्डिल्या दाढा उभे रोमांच ऊठले ॥ ४ ॥
अद्भूत गर्जना केली मेघची बोळले भुमीं ।
तूटले गिरिचे गाभे, फूटले, सिंधु आटले ! ॥ ५ ॥
अद्भूत वेश आवेशें कोपला रणकर्कशू ।
धर्मसंस्थापनेसाठीं **दास** तो ऊठिला बळें ॥ ६ ॥

---

१ ब्रम्हांडाचा लय होण्याचा प्रसंग. २ आकाशमंडळांत ३ वज्रतुल्य असा उजवा बाहु. ४ त्यासमोर उभा कोण टाकील? ५ त्याचे दोन्ही डोळे सूर्यबिंबासारखे आरक्तवर्ण होते. ६ कर्कर आवाज करणाऱ्या त्याच्या दाढा एकमेकांवर घर्डिल्या होत्या. ७ त्याच्या गर्जनेमुळें प्रत्यक्ष मेघच पृथ्वीवर अवतरले आहेत. असें वाटे. ८ पर्वत द्विधा झाले. ९ मारुतीच्या कोपाचें कारण येथें सांगितल्यामुळें या स्तोत्राला अद्भुत गोडी आली आहे. धर्माच्या ऱ्हासास कारणीभूत झालेऱ्या दुष्टांवर मारुतिराय रागावले होते ! ते दीनच्छळकांवर संतापले होते. हा दिव्य कोप सत्कार्यासाठीं असल्यामुळें श्रेष्ठांचा सद्गुणच आहे.

( ४ )

अंजनीसुत प्रचंड वज्रपुच्छ कालदंड ।
शक्ति पाहतां वितंड[1] दैत्य मारिले उदंड[2] ॥ १ ॥
धगधगी तसी कळा वितंड शक्ति चंचळा ।
चळचळीतसे लिळा प्रचंड भीम आगळा ॥ २ ॥
उदंड वाढला असे विराट धाकुटा[3] दिसे ! ।
त्यजूनि सूर्यमंडळा नभांत भीम आगळा[4] ॥ ३ ॥
ळुळीत बाळकी लिळा गिळोनि सूर्यमंडळा ।
बहुत पोळतां क्षणीं थुंकिलोंचि[5] तत्क्षणीं ॥ ४ ॥
धगधगीत बुबुळा[6] प्रत्यक्ष सूर्यमंडळा ।
कराळ[7] काळमूख तो रिपूकुळासि दुःख[8] तो ॥ ५ ॥
रुपें कपी अचाट हा सुवर्णकष्ट[9]चास तो ।
फिरे उदास[10] दास तो खळांस काळ भासतो ॥ ६ ॥
झळक झळक दामिनी[11] वितंड काळकामिनी ।
तयापरी झळाझळी ळळीत रोमजावळी ॥ ७ ॥

---

१ भयंकर, प्रचंड. २ पुष्कळ. ३ हा एवढा वाढला कीं त्याच्यापुढें ब्रह्मांड खुजें झालें ! ४ आकाशांत हा सूर्यमंडळाहून अधिक तेजस्वी व प्रचंड दिसूं लागला. ५ इंद्रवज्र हनूला लागतांच तो गळून खालीं पडला. ६ त्याचे लाल व तेजस्वी डोळे सूर्यमंडळासारखे दिसत होते. ७ भयानक. ८ तो शत्रुकुळाला भयानक व काळमुखासारखा दुःसह होता. ९ तापलेल्या सोन्याच्या पत्र्यासारखा. १० संसारांत कोठेंही आसक्त नाहीं असा. पूर्ण निरिच्छपणानें. ११ काळाची स्त्री जी वीज तिच्याप्रमाणें त्याच्या केशावर चमक होती.

**समस्त**–प्राणनाथरे करी जना सनाथरे ।
अतूळ तूळणा नसे अतूळ शक्ति वीलसे ॥ ८
रुपें रसाळ बाळकू समस्तचित्तचाळकू[1] ।
कपी परंतु ईश्वरू विशेष लाधला वरू ॥ ९ ॥
स्वरुद्र क्षोभल्यावरी तयासि कोण सांवरी ।
गुणागळा[2] परोपरी सतेज रूप ईश्वरी ॥ १० ॥
**समर्थदास** हा भला कपीकुळांत शोभला ।
सुरारिकाळ क्षोभला त्रिकूट जिंकिला भला ॥ ११ ॥

(५)

हनूमंता रामदूता वायुपुत्रा महाबला ॥
ब्रह्मचारी कपीनाथा विश्वंभरा जगत्पते ॥ १ ॥
कामांतका दानवारी शोकहारी दयाघना ॥
महारुद्रा मुख्यप्राणा मूळमूर्ती पुरातना ॥ २ ॥
वज्रदेही सौख्यकारी भीमरूपा प्रभंजना ॥
पंचभूतां मूळमाया तूंचि कर्ता समस्तही ॥ ३ ॥
स्थितिरूपें तूंचि विष्णू संहारक पशूपती ॥
परात्परा स्वयंज्योती नामरूपा गुणातिता ॥ ४ ॥
सांगतां वर्णितां येना वेदशास्त्रां पडे ठकों[3] ॥
शेष तो शिणलों[4] भारी 'नेति नेति' परा श्रुति ॥ ५ ॥

---

१ सर्वांच्या चित्ताचा प्रेरक. २ त्रिगुणातीत. ३ मौन ४ मारुतिराय। राम, भक्त व देव हे भिन्न नाहींत. देवभक्तांचें ऐक्य वेदांनीच प्रतिपादिलें आहे असा या स्तोत्रांत भावार्थ आहे.

धन्यावतार कैसा हा भक्तालागिं परोपरी ॥
रामकार्जीं उतावेळा भक्ता रक्षक सारथी ॥ ६ ॥
वारितो दुर्घटें[1] मोठीं संकटीं धांवतो त्वरें ।
दयाळ हा पूर्ण दाता नाम घेतांचि पावतो ॥ ७ ॥
धीर वीर कपी मोठा मागें[2] नव्हेचि सर्वथा ।
उड्डाण अद्भूत ज्याचें लंघिले सागरा जळा ॥ ८ ॥
देउनी लिखिता हातीं नमस्कारी सितावरा ।
वाचितां सौमित्र अंगें राम सूखें सुखावला ॥ ९ ॥
गर्जती स्वानंदमेळीं ब्रम्हानंदें सकळही ।
अपार महिमा मोठा ब्रम्हादीकांसि नाकळे ॥ १० ॥
अद्भूत पुच्छ तें कैसें भोंवंडीं नभपोकळी ।
फांकलें तेज तें भारी झांकेलें सूर्यमंडळा ॥ ११ ॥
देखतां रूप पैं ज्याचें उड्डाण अद्भुत शोभलें ।
ध्वजांत उर्ध्व तो बाहू वामहस्त कटीवरी ॥ १२ ॥
कसिली हेमकासोटी[3] घंटा किंकिणि भोंवत्या ।
मेखळें जडिलीं मुक्तें दिव्य रत्नें परोपरी ॥ १३ ॥
माथां मुगुट तो कैसा कोटि चंद्रार्क लोपले ।
कुंडलें दिव्य तीं कानीं मुक्तमाळा विराजते ॥ १४ ॥
केशर रेखिलें भाळीं मुख सूहास्य चांगलें ।
मुद्रिका शोभती बोटीं कंकणें कर मंडित ॥ १५ ॥

---

१ संकटें. २ कधी माघार घेणारा नव्हे. ३ सुवर्णाची लंगोटी.

चरणीं वाजती अंदू[1] पदीं तोडर गर्जती ।
कैवारी नाथ दीनांचा स्वामी कैवल्यदायकू[2] ॥ १६ ॥
स्मरतां पाविजे मुक्ती जन्ममृत्यूंसि वारितो ।
कांपती दैत्य तेजासी भुभु:काराचियां बळें ॥ १७ ॥
पाडितो राक्षसू नेटें[3] आपटी महिमंडळा ।
सौमित्रप्राण[4]दाताची कपीकुळांत मंडणू ॥ १८ ॥
दंडिली पाताळशक्ती अहीमही निर्दाळिले ॥
सोडवीलें रामचंद्रा कीर्ति हे भुवनत्रयीं ॥ १९ ॥
विख्यात ब्रीद तें कैसें मोक्षदाता चिरंजिवी ॥
कल्याण त्याचेंनि नामें भूतपीशाच्च कांपती ॥ २० ॥
सर्प वृश्चिक पश्चादी विष–शीत–निवारण
आवडी स्मरतां भावें काळकृतांत धाकतो ॥ २१ ॥
संकटें–बंधनें–बाधा–दु:ख–दारिद्र–नाशका ॥
ब्रह्मग्रह[5]–पिडा–व्याधी ब्रह्महत्यादि पातकें ॥ २२ ॥
पूरवीं सकळही आशा भक्तकामकल्पतरू[6] ॥
त्रिकाळीं पठतां स्तोत्र इच्छिलें पावती जनीं ॥ २३ ॥
परंतू पाहिजे भक्ती संधी[7] कांहीं धरूं नका ॥
**रामदासा** सहाकारी सांभाळीतों पदोपदीं ॥ २४ ॥

---

१ पायांतील हंसळी. २ ज्ञानदाता, मोक्षदाता. ३ जोरानें. ४ लक्ष्मणाचे प्राण वांचविणारा. ५ ब्रह्मसंबंध, शारीरिक व्याधि, ब्रह्महत्यादि पातकें, नानाविध संकटें, बंधनें ह्म० कारागृहवास, उष्णशीतादि बाधा, दु:ख, दारिद्र, भूतपिशाच्चादिकांच्या पीडा, या सर्वांपासून ह्मणजे त्रिविधतापांपासून मारुतिराय आपल्या उपासकांला सोडवितात. ६ आपल्या उपासकांच्या सर्व कामना पुरविणारा कल्पवृक्ष. ७ संदेह, शंका.

( ६ )

रुद्र हा समुद्र देखतांक्षणीं उंठावला ।
शिरोणिचें[1] किराणे[2] सज्ज त्रिकुटास पावला ॥
वात जातसे तसाचि स्थूळ देह राहिला ।
वाँवरोनि[3] वावरोनि तो त्रिकूट पाहिला ॥ १ ॥
हीनदेवें[4] दीनरूप देखतांचि पावला ।
गड्गडीत घड्घडीत कड्कडीत कोपला, ।
लाटि कूटि पाडि फोटि झोडि झोडि झोडला ।
दैत्यतोक[5] एक हाक सर्वगर्व मोडिला ॥ २ ॥
काळदंडसे प्रचंड ते वितंड जातसे ।
भारभार राजभार पुच्छभार होतसे ॥
पाडिले पछाडिले रुधीरपूर व्हातसे[6] ।
दैत्य बोलती[7], 'बळें पळोन काय ध्यातसे?' ॥ ३ ॥
काळकूट[8] ते त्रिकूट धूट धूट ऊठिलें ।
दाट थाट लाट लाट कूट कूट कूटिलें ॥
घोर मार ते सुमार लूट लूट लूटिलें ।
चिर्डिलेचि घर्डिलेचि फूट फूट फूटिले ॥ ४ ॥

---

१ महत्वाचें, मोठें. २ उड्डाण. ३ सूक्ष्म दृर्शनें न्याहाळून. ४ हीन दीन झालेले पाहून. ५ राक्षसांचीं मुलें. ६ रक्ताचे पूर वाहूं लागलें. ७ दैत्य आपापसांत बोलूं लागले कीं 'या पासून दूर पळणार तरी कोठें! जिकडे जाल तिकडे हा आहेच !.' ८ त्रिकटपर्वतावरचे दुष्ट धटिंगण.

वज्र पुच्छ त्यासि तुच्छ मानिलें निशाचरीं ।
सर्वही खणखणाट ऊठिले घरोघरीं ॥
फुटेचिना तुटेचिना समस्त भागले करीं ।
लट्लटीत कांपती बहुत धाक अंतरीं ॥ ५ ॥
हात पाय मान माजे वोढितें पछाडितें ।
अडचणींत अड्कवूनि पीळ पेंच काढितें ! ॥
लोहंदंडसें अखंड राक्षसासि ताडितें ।
मूळ जाळ व्याळ जाळ दैत्यकूळ नाडितें ॥ ६ ॥
थोर धाक एक हाक त्रिकुटांत पावलें ।
घरोघरींच वळवळी पुढें उदंड ऊरलें ॥
बैसले उदंड दैत्य तें सभेंत घूसलें !
सभा विटंबिली बळेंचि कोणसें न सूचलें ॥ ७ ॥
गुप्तरूप मारुती दशाननाकडे भरे ।
मुगूट पाडिला शिरीं कठोर वज्र ठेंासरे ॥
सभा विटंबिली बळेंचि गर्गरीत वावरे ।
बलाढ्य दैत्य मारिले कठीण पुच्छ नावरे ॥ ८ ॥
हस्तमार दैत्यमार दंडमार होतसे ।
लंडसे कलंडसे उलंडलेचि भंडसे ॥

---

१ वज्रासारखें तें पुच्छ ! त्याला ते राक्षस फोडूं तोडूं लागले पण त्यांचे हात मात्र थकले ! २ कंबर. ३ लोखंडाच्या मुसळाप्रमाणें. ४ वळला. ५ गुद्दा ठेवून दिला. ६ गाडग्यांच्या उतरंडीप्रमाणें ते एकमेकावर कोलंडत व लज्जा पावत !

येत येत पुच्छकेत दैत्य सर्व बोलती ।
[1] गळीत बैसले भुमीं न बोलती न चालती ॥ ९ ॥

उदंड देव [2] आटिले तयांसि भीम आटितो ।
रामदूत वातसूत लाटि लाटि लाटितो ॥
ऊठ आमुचे समस्त कूट कूट कूटितो ।
[3] धूट धूट दैत्य त्यास लूट लूट लूटितो ॥ १० ॥

समस्त दैत्य आळितो बळें त्रिकूट जाळितो ।
पुरांत गोपुरें बरीं निशाचरांसि वाळितो ॥
उदंड अग्नि लाविला बहू बळें उठावला ।
कडाडिला तडाडिला भडाडिला थडाडिला ॥ ११ ॥

उदंड जाळिलीं घरें कितेक भार खेचरें ।
किलाॅण धांवती भरें सुरांस वाटलें बरें ॥
उदंड दैत्य भोवडी तयांस पुच्छ भोंवडी ।
काडाकडी खडाखडी गडागडी घडाघडी ॥ १२ ॥

बळें [5] चपेट मारिला उदंड दैत्य [6] हारिला ।
तरारिला थरारिला भयंकरू भरारिला ॥
गद्गदी तनू वितंड सागरीं सरारिला ।
जानकीस भेटला प्रभूकडे सरारिला ॥ १३ ॥

---

१ गळून, घाबरून. २ ज्या राक्षसांनीं पूर्वी देवांना छळले त्यांनाच मारुतीनें आतां यथेच्छ बडविलें. ३ धटिंगण, बलाढ्य. ४ समुदाय, टोळ्या. ५ चापट, तडाखा. ६ जिंकिला. ७ पुढें चालला. ८ वळला.

काळसे विशाळ दैत्य त्यांत एकला मरे ।
थोर धाक एक हांक काळचक्र[1] नावरे ॥
शक्ति शोधिली बळेंचि भव्य देखिले धुरे ।
वानरांसहीत **रामदास** भेटले त्वरें ॥ १४ ॥

( ७ )

भुवनदहन[2]काळीं काळ विक्राळ जैसा ।
सकळ गिळित ऊभा भासला भीम तैसा ।
दुपट कपित झोंकें झोंकिली मेदिनी हे ।
तळवळ धरि धाकें धोकली जाउं पाहे ॥ १ ॥
गिरिवरुनि उडाला तो गिरी गुप्त झाला ।
घसरत दश गांवें भूमिकेमाजि आला ।
उडति झडझडाटें वृक्ष हे नेटपोटें[3] ।
पडति कडकडाटें अंगवातें धुधोंटें[4] ॥ २ ॥
थरकत धरणी हे हाणितां वज्रपुच्छें ।
रगडित रणरंगीं राक्षसें तृणतुच्छें[5] ।

१ ह्या श्लोकांत सर्व स्तोत्राचें रहस्य आहे. काळचक्रासारखा मारुति दैत्यसमुदायांत शिरला, राक्षसांना खूप चडवून त्यानें निर्वीर्य करून जिंकिले, रामाची स्त्री ह्मणजे दैवशक्ति शोधिली, भव्य ह्मणजे प्रचंड वीर निर्मून रामसेनेंत धुरेला ह्मणजे अग्रभागीं स्थापिले,—व अशा कालचक्ररूप मारुतींचें दर्शन समर्थांना झालें! २ प्रळयकाळीं. ३ वेगानें. ४ सोसाट्यांचा झंझावात. ५ गवताच्या काडीसारखे तुच्छ राक्षस.

सहज रिपुदळाचा थोर संहार केला ।
अवघड गड लंका शीघ्र जाळूनि आला ॥ ३ ॥
सहज करतळें जो मेरुमंदार पाडी ।
दशवदन रिपू हे कोण कीती बडारी[1] ।
अगणित गणवेना शक्ति काळासि हारी[2] ।
पवनतनुज पाहा पूर्ण रुद्रावतारी ॥ ४ ॥

( ८ )

कपिवर उठला तो वेग अद्भुत केला ।
त्रिभुवनजन[3]लोकीं कीर्तिचा घोष केला ॥
रघुपति[4] उपकारें दाटले थोर भावें ! ।
' परम धिर उदारें रक्षिलें सौख्यकारें ' ॥ १ ॥
सबळ दळ[5] मिळालें युद्ध ऊदंड झालें ।
कपिकटक निमालें[6], पाहतां येश गेलें, ॥
परदळ शरघातें कोटिच्या कोटि प्रेतें ।
अभिनव रणपातें दुःख बिभीषणातें ॥ २ ॥
कपिरिसघन[7]दाटी जाहली थोर आटी ।
ह्मणउनि जगजेठी धांवणें चार कोटी ॥

---

१ दुकाळलेला, भिकारी. २ जिकी. ३ स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तीन लोकांतल्या लोकांत. ४ रामरायही मारुतीच्या उपकारभाराखालीं लवले ! ५ दोन्हीकडचे शिपाई. ६ मेले. ७ रामपक्षीय वानर व रीस हे संग्रामांत कामास आले, ह्मणून जगजेठी ह्म. जगांत श्रेष्ठ अशा मारुतिरायाला चार कोट योजनें दूर उड्डाण करावें लागलें.

मृतिविरहित[1] ठेले मोकळे सिद्ध झाले ।
सकळ जन निवाले[2] धन्य सामर्थ्य चालें ॥ ३ ॥
बहु प्रिय रघुनाथा, मुख्य तूं प्राणनाथा, ।
उठविं मज अनाथा, दूर सांडोनि वेथा ॥
झडकरि भिमराया तूं करी दृढ[3] काया ।
रघुविर भजना या लागवेगेंचि जाया ॥ ४ ॥
तुजविण मज पाहें पाहतां कोण आहे ?
ह्मणउनि मन माझें रे तुझी वाट पाहे ॥
निज[4] तुज निरवीलें, पाहिलें, आठवीलें, ।
सकळिक निजदासांलागिं सांभाळवीलें[5] ॥ ५ ॥
उचित हित करावें, उद्धरावें, धरावें, ।
अनहित न करावें, त्वां जनीं येश[6] घ्यावें, ॥
अघटित[7] घडवावें, सेवकां सोडवावें, ।
हरिभजन घडावें, दुःख तें वीर्घडावें[8], ॥ ६ ॥

---

१ त्यांना मरणापासून सोडविलें, व तेही वीर पुन्हां युद्धाला 'सिद्ध झाले.' २ आनंदित झाले. ३ रोगमुक्त व सुदृढ कर. शारीरिक पीडा झाल्यावेळीं समर्थांनीं हें प्रेमळ स्तोत्र केलें आहे. ४ रामानें आपले भक्त तुझ्या स्वाधीन केले आहेत. ५ श्रीसमर्थांना उपदेश साक्षात् रामरायांनीं दिला होता, पण मारुतिरायाच्या हातीं ते त्यांना देऊन गेले होते. 'उपदेश देवोनि दिधला मारुती । स्वयें रघुपती नीरवीता ' असें समर्थांनींच एका अभंगांत ह्मटलें आहे. व 'राम हनुमंत आत्मरूपी ' याप्रमाणें दोघांचें ऐक्य पुढें वर्णिलें आहे. 'आपल्या सर्व भक्तांचा सांभाळ रामराय तुजकडून करवितात, ' असा चवथ्या चरणाचा अर्थ आहे. ६ यश, श्रेय. ७ अद्भुत पराक्रम. ८ मोडून टाकावें.

प्रभुवर विररांया[1]! जाहली दृढ काया ।
परदळ निवटाया, दैत्यकुळें कुटाया, ॥
गिरिवर उपटाया रम्य वेषें नटाया ।
तुजचि अलगठाया[2] ठेविलें मुख्य ठाया ॥ ७ ॥
बहुत संबळ[3] सांठा मागतों अल्प वांटा ! ।
न करित हित कांठा थोर होईल ताठा ॥
कृपणपण नसावें, भव्य लोकीं दिसावें, ।
अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें, ॥ ८ ॥
जळधर[4] करुणेचा अंतरामाजी राहे ।
तरि तुज करुणा हे कां नये सांग पा हे ? ॥
कठिण हृदय झालें ? काय कारुण्य गेलें ? ।
न पवसि मज कां रे ? म्यां तुझें काय केलें ? ॥ ९ ॥
वडिलपण धरावें, सेवकां सांवरावें, ।
अनहित न करावें, तूर्त हातीं धरावें, ॥
निपटचि हटवादें प्रार्थिला शब्दभेदें ।
कपिधन करुणेचा बोळला रामवेधें ! ॥ १० ॥
बहुताचि करुणा या लोटली देवराया ।
सहजचि कपिकेतें जाहली दृढ काया ॥
परम सुख विलासें सर्व दासानुदासें ।
पवनतनुज तोषें वंदिलें सावकाशें ॥ ११ ॥

---

१ वीरश्रेष्टा. २ वेगळ्या स्वतंत्र ठिकाणीं. ३ तुझ्या ठायीं शक्ति व रामप्रेम बहुत आहे; मला त्यांतला थोडासा वांटा दे. ४ तूं दयेचा मेघ असून 'अवळीं अंतरीं' राहतोस,

( ९ )

लघूशी परी मूर्ति हे हाटकाची । करावी तथा मारुतीनाटकाची ॥
असावी सदा ताइतामाजि दंडीं । समारंगणीं पाठें दीजे उदंडीं ॥१॥
ठसा हेम धातूवरी वायुसूतू । तथा ताइताचे परी रौप्य धातू ॥
तयाची पुजा मंदवारीं करावी । बरी आवडी अति पोटीं धरावी ॥२॥
स्वधामासि जातां प्रभू राम राजा । हनूमंत तो ठेविला याच काजा ॥
सदा सर्वदा राम दासासि पावे । खळीं गांजतां ध्यान सोडून धांवे ।३।

## अंजनीगीत.

लंकेहूनी अयोध्ये येतां । रामलक्ष्मण सीता ।
हनूमंतें अंजनीमाता । दाखविली रामा ॥ १ ॥
त्रवर्गे केला नमस्कार । काय बोले रघूवीर ।
तुझ्या कुमरें आह्मां थोर । उपकार केला ॥२॥
सीताशुद्धी येणें केली । लक्षुमणाची शक्ती हरिली ।
लंका जाळुनी निर्दाळिली । राक्षससेना ॥ ३ ॥
अहिरावण महिरावण जाणा । घात करिती आमुच्या प्राणा ।
देवीरूपें दोघां जणा । रक्षियलें माते ॥ ४ ॥

---

१ सोन्याची. २ मारुतीची मूर्ति ताइतांत घालून दंडाला बांधावी, ह्मणजे हजारो वीरांना लढाईतून पिटून काढावयाचें सामर्थ्य तुमच्या अंगीं येईल. ३ शानिवारीं. ४ आवड, प्रेम. ५ वैकुंठास जातांना. ६ समर्थ आपला अनुभव सांगतात कीं ' मारुतिरायाची मजवर पूर्ण कृपा आहे व जेव्हां जेव्हां दुष्ट मला पीडा करितात तेव्हां तेव्हां ते आपलें ध्यान सोडून मत्संरक्षार्थ धांवतात । '

सद्गुरूमुखें गूज पुरविलें । राघवें तुला जाण निरविलें ॥
साच तूं करी ब्रीद पावना । हे दयानिधे वायुनंदना ॥ ९ ॥
भीम–अष्टका वाचितां नरू । अक्षयीं तया भीम दे वरू ॥
साक्ष बाणली राघवा–मना । हे दयानिधे वायुनंदना ॥ १० ॥

---

## श्रीमारुतिजन्माचे अभंग.

(१)

देवांगनांहातीं आणविला शृंगी । यज्ञ तो प्रसंगीं आरंभिला ॥१॥
विभांडिका क्रोध आला असे मारी । अयोध्येभीतरीं वेगीं आला ॥२॥
राजा दशरथ सामोरा जाऊनी । अतिप्रीति करूनि सभे नेला ॥ ३ ॥
पुत्रस्नुषा दोन्ही देखतां नयनीं । आनंदला मनी नामा ह्मणे ॥ ४ ॥

२

आनंदोनी ह्मणे राया धन्य केलें । इच्छिले सोहळे पुरवीन ॥ १ ॥
यज्ञाचा आरंभ करी लवलाह्यां । पुसोनी आचार्या वसिष्ठासी ॥ २ ॥
सर्व ऋषीजन मिळाले सकळ । मंत्राचा कल्लोळ करिताती ॥ ३ ॥
नामा ह्मणे शृंगी मुख्यत्वें शोभला । यज्ञ आरंभिला तेणें तेव्हां ॥४॥

( ३ )

आरंभिला यज्ञ संतोष सर्वत्र । आनंदें नगर दुमदुमित ॥ १ ॥

---

१ दशरथराजानें पुत्रकामेष्टियज्ञ करण्यासाठीं शृंगीऋषीला अप्सरा पाठवून आणविलें. २ ऋष्यशृंगीचा पिता विभांडक हा महामुनि कोपिष्ट होता. ३ अयोध्यानगरींत. ४ शृंगी व त्याची भार्या शांता यांस पाहून. ५ शीघ्र.

यज्ञनारायण संतोष पावला । प्रत्यक्ष तो आला कुंडांतूनी ॥ २ ॥
पायस तो पात्र घेऊनियां करीं । शृंगीस झडकरी बोलतसे ॥ ३ ॥
विलंब करीतां विघ्न वोढवेल । सत्वर वहिलो भाग करा ॥ ४ ॥
नामा ह्मणे देव येईल पोटासी । ऐसें गुज त्यासी अग्नी सांगे ॥ ६ ॥

( ४ )

विभाग सत्वर वसिष्ठानें केले । राया बोलाविलें सन्निधचि ॥ १ ॥
प्रथम तो भाग कौसल्येसी दिला । तेणें क्रोध आला कैमिष्ठेसीं ॥२॥
येतांचि तो क्रोध विघ्न वोढवले । मुर्खी झडपिले पिंड घारी ॥ ३ ॥
आसडोनि पिंड घारीनें पै नेला । नामा म्हणे घातला अंजनीकरीं ॥४॥

( ५ )

ऋष्यमुक पर्वतीं ध्यानस्थ अंजनी । सांगतसे कानीं खूण वायु ॥ १ ॥
' तव करीं पिंड पडतांचि सत्वर । भक्षी कां निर्धार स्मरण मात्रें ॥ २ ॥
शिवस्मरणें पिंड प्राशन पै केला । जन्मासी तो आला बळिया रुद्र ॥ ३ ॥
नामा ह्मणे जन्म पावतांचि बाळ । झाला असे काळ रविमंडला ॥ ४ ॥

[ ६ ]

पिंड घारीनें झडपिला । अंजनीनें तो सेविला ॥ १ ॥
अंजनीच्या तपासाठीं । महारुद्र आले पोटीं ॥ २ ॥
चैत्र शुद्ध पौर्णिमेसी । सूर्योदय समयेसीं ॥ ३ ॥
महारुद्र प्रगटले । नामा ह्मणें वंदिलें ॥ ४ ॥

---

१ प्राप्त होईल. २ प्रथम. ३ कैकयीला. ४ घारीनें पिंड उडविला.
५ अंजनीच्या हातांत.

[ ७ ]

ऋष्यमूक पर्वतीं अंजनी तप करी । आठविला अंतरीं सदाशिव ॥१॥
तपाचीया अंतीं शिव जाला प्रसन्न । 'मागे वरदान काय इच्छा' ॥२॥
येरी ह्मणे, 'तुज ऐसा व्हावा पुत्र । ज्ञानी भक्त पवित्र उत्तम गुणी' ॥३॥
ह्मणतसे शिव 'अंजुळी पसरुनी । बैस माझे ध्यानीं समाधान ॥ ४ ॥
वायुदेव येउनि प्रसाद देइल तुजला । भक्षीं कां वहिला अवलंबें' ॥५॥
**एकाजनार्दनीं** घारी नेतां पिंड । वायुनें प्रचंड आमुडिला ॥ ६ ॥

[ ८ ]

घारी मुखींचा पिंड अंजनीच्या करीं । पडतां निर्धारीं भक्षियेला ॥ १ ॥
नवमास होतां जाली ती प्रसूत । दिव्य वायुसुत प्रगटला ॥ २ ॥
वानराचा वेष सुवर्ण कौपीनें । दिसतीं शोभायमान कुंडलें तीं ॥ ३ ॥
जन्मतांचि जेणें सूर्यातें धरिलें । इंद्रादिकां दिले घोर मार ॥ ४ ॥
अमरपती मारी वज्र हनुवटी । पडिला कपाटीं मेरुचीया ॥ ५ ॥
वायुदेव येवोनी बाळ तो उचालिला । अवघाचि रोधिला प्राण तेथें ॥६॥
सकळ देव मिळोनी प्रसन्न पैं होती । वरदान देती मारुतीसी ॥७॥
सर्व देव मिळोनी अंजनीसी बाळ । देतां प्रातःकाळ होतां तेव्हां ॥ ८ ॥
तिथी ती पूर्णिमा चैत्र मास जाण । **एकाजनार्दनीं** रूपासि आला॥९॥

---

१ लंगोटी, '**सुवर्ण कासोटी.**' २ गुहेंत.

# श्रीमारुतिस्तुति.

## अभंग.

[ १ ]

शरण शरण जी हनुमंता । तुज आलों रामदूता ॥ १ ॥
काय भक्तिच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ ध्रु० ॥
शूर आणि धीर । स्वामिकाजीं तूं सादर ॥ २ ॥
**तुका** ह्मणे रुद्रा । अंजनीचिया कुमरा ॥ ३ ॥

[ २ ]

केली सीताशुद्धी । मूळ रामायणा आधीं ॥ १ ॥
ऐसा प्रतापी गहन । सकळ भक्तांचें भूषण ॥ ध्रु० ॥
जाऊनि पाताळा । केली देवींची अवकळा ॥ २ ॥
राम लक्षुमण । नेले आणिले चोरून ॥ ३ ॥
जोडुनियां कर । उभा सन्मुख समोर ॥ ४ ॥
**तुका** ह्मणे जपें । वायुसुता जाती पापें ॥ ५ ॥

[ ३ ]

काम घातला बांदोडी । काळ केला देशधडी ॥ १ ॥
तथा माझे दंडवत । कपीकुळीं हनूमंत ॥ ध्रु० ॥

---

१ वीरा. समर्थांनीं 'पाताळदेवताहंता' ह्मणून मारुतिरायाचा गौरव केला आहेच. ३ वायुसुताचा जप ह्म० मारुतीचें ध्यान केल्यानें पापें नष्ट होतात. ४ चंदिखान्यांत. ५ दूर पिटाळून लावला.

शरीर वज्राऐसें । कवळी ब्रम्हांड जो पुच्छें ॥ २ ॥
रामाच्या सेवका । शरण आलों ह्मणे तुका ॥ ३ ॥

[ ४ ]

हनूमंत महाबळी । रावणाची दाढी जाळी ॥ १ ॥
तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ ध्रु० ॥
करोनि उड्डाण । केलें लंकेचें शोधन ॥ २ ॥
जाळियेली लंका । धन्य धन्य ह्मणे तुका ॥ ३ ॥

[ ५ ]

नामपाठभक्ति[2] हनूमंतें केली । सेवा रुजु झाली देवा तेणें ॥ १ ॥
नामपाठें शक्ति अद्भुत हें अंगीं । धन्य झाला जगीं कपिनाथ ॥ २ ॥
जनार्दनाचा एका सेवोनी आदरें । नामपाठ स्मरे सर्वकाळ ॥ ३ ॥

[ ६ ]

अहि रावणें राम धरूनियां नेला थोर मांडिलें निर्वाण ।
पायातळीं राम उभा करूनियां ह्मणतसे करीरे स्मरण ॥१॥

---

१ 'दहन' असाही पाठ आहे. २ नामस्मरणरूप भक्ति; मारुतिरायांनीं रामप्रभुपाशीं नामस्मरणाचाच (अध्यात्मरामायण, युद्धकांड अ. १६) वर मागितला होताः—

अतस्त्वन्नामसततं स्मरन्स्थास्यामि भूतले ।
यावत्स्थास्यति ते नाम लोके तावत्कलेवरम् ॥ १ ॥

पंतांच्या वाणीनें बोलावयाचें ह्मणजेः—

यावत्काळ तुझें यश तोंवर तव पाददास वांचावा ।
त्वच्चरितामृतसद्रस हृदयघटामाजि नित्य सांचावा ॥ १ ॥

जगाच्या संकटीं रामासें स्मरती रामें स्मरावें कवणा ।
देवाचें मरण भक्तें चुकविलें ह्मणोनी अमर केला हनूमंत ।२।
न तुटे न जळे न बुडे न ढळे संसारीं असोनी अलिप्त ।
दुसरेंनि अवतारें रामासी जन्मू परी हनूमंत जन्मातीतू ।४।
देवासी जन्ममरण दिसते अविनासी ।
एका जनार्दनें केले भक्तरे या ।। ५ ।।

[ ७ ]

धन्य धन्य ते वानर । जवळी राम निरंतर ।। १ ।।
ब्रह्मादिकां नातुडे ध्यानीं । राम वानरगोठणीं[१] ।। २ ।।
वेदश्रुति नेणे महिमा । तो गुज[२] सांगे प्लवंगमा ।। ३ ।।
वानरवेष धरी देव । भाग्यें लाधला केशव ।। ४ ।।
दास ह्मणे ते देवाचे । आवडले रघुनाथाचे ।। ५ ।।

[ ८ ]

उपदेश देऊनी दिधला मारुती ।। स्वयें रघुपती नीरविता ।। १ ।।
नीरवितां तेणें झालों रामदास ।। संसारीं उदास[३] ह्मणोमीयां ।। २ ।।
ह्मणोनी आमुचें कुळीं कुळदैवत ।। राम हनूमंत आत्मरूपीं ।। ३ ।।
आत्मरूपीं झाला रामीं रामदास ।। केला उपदेश दीनोद्धारा ।। ४ ।।

---

१ सुग्रीव, अंगद, मारुति इत्यादि वानरांच्या मेळ्यांत. २ मनांतल्या गोष्टी रहस्य. ३ उदासीन, संगरहित.

[ ९ ]

कष्टी झाला जीव केली आठवण । पावलें[1] चरण मारुतीचे ॥ १ ॥
संसारसागरीं आक्रांत वाटला । भुभुःकार केला मारुतीनें ॥ २ ॥
मज नाहीं कोणी मारुतीवांचूनी । चिंतितां निर्वाणीं उडी घाली ॥३॥
माझें जिणें माझ्या मारुती लागलें । तेणें माझें केलें समाधान ॥४॥
उल्लासलें चित्त पाहतां स्वरूप । **दास** ह्मणे रूप राघोबाचें ॥ ५ ॥

[ १० ]

बाप[2] माझा ब्रह्मचारी । मातेपरी अवघ्या नारी ॥ १ ॥
उपजतां बाळपणीं । गिळूं पाहे वासरमणी[3] ॥ २ ॥
अंगीं सेंदुराची उटी । जया सोन्याची कासोटी ॥ ३ ॥
रामकृपेची साउली । **रामदासाची** माउली ॥ ४ ॥

[ ११ ]

पडतां संकष्टीं जीव जडभारी । स्मरावा अंतरीं बलभीम ॥ धृ ॥
बलभीम माझा सखा सहोदर । निवारी दुर्धर तापत्रय ॥ १ ॥
तापत्रयबाधा बाधूं न शके कांहीं । मारुतीच्या पायीं चित्त ठेवा ॥२॥
ठेवा संचिताचा मज उघडला । कैवारी जोडला हनुमंत ॥ ३ ॥
हनुमंत माझें अंगीचें कवच । मग भय कैचें **माणिक** ह्मणे ॥ ४ ॥

[ १२ ]

रामाचीया दूता अंजनीच्या सुता । धांव दिनानाथा आतां वेगीं ॥
वेगीं धांव आतां वायूच्या नंदना । भव हा बंधना तोडी देवा ॥

---

१ प्रसन्न झालें. २ मारुतिराय. ३ सूर्य.

तोडी देवा माझी संसाराची बेडी । सज्जनाची जोडी सदा घडों ।२।
सदा घडो तुझी पायाची ही सेवा । आणिक कांहीं देवा देवूं नको ॥
देवूं नको कांहीं कुबुद्धि वासना । माणिक प्रार्थना करीतसे ॥ ४ ॥

## पदें.

[ १ ]

मारुती सख्या बलभीमारे ॥ ध्रु० ॥
अंजनिचे वचनांजन लेउनि । दाखविशी बलसीमा रे ॥ १ ॥
वज्रतनू बलभीमपराक्रम । संगित गायनसीमारे ॥ २ ॥
दास ह्मणे हा रक्षीं आह्मां । त्रिभुवनपावननामारे ॥ ३ ॥

( २ )

कैवारी हनुमान । आमुचा कैवारी हनुमान ॥ ध्रु० ॥
पाठीं असतां तो अंगझेठी । वरकड काय गुमान? ॥ १ ॥
नित्य निरंतर भजकां रक्षी । धरूनियां अभिमान ॥ २ ॥
दासा रक्षिल हाच भरोंसा । वदतों त्याची आण ॥ ३ ॥

[ ३ ]

भज मनुजा हनुमान् । कृपाळू भज मनुजा हनुमान् ॥ ध्रु० ॥
भावें स्मरतां पदकमळातें । रावतसे घरिं ज्ञान ॥ कृ० ॥ १ ॥
पूजनिं अर्चनिं प्रेमें कीर्तनिं । सांडुनियां अभिमान ॥ २ ॥
निश्चय हा पदिं दृढतर जालियां । कांहीं नसे तुज वाण ॥ ३ ॥

---

१ तिची आज्ञा हेंच कोणी अंजन. २ जगांत श्रेष्ठ असा. ३ इतरांची आम्हीं काय परवा करितो? ४ भरंवसा. ५ सेवा करितें.

सद्गुणिं कीर्तनिं तन्मय मानस । दे पद मग निर्वाण ॥ ४ ॥
आत्मत्वें जग ब्रह्म चराचर । दे दिठिं सहज समान ॥ ५ ॥
देवनाथप्रभु ईक्षणिं सहजे । लाधत अनुभवखाण ॥ ६ ॥

## मारुतीस्तवाच्या आर्या.

श्रीमद्रामपदांबुजमधुपवरा ! मारुते ! महाबाहो ! ।
या दीनावरि सदय, त्यजुनि उदासीनतेसि, तूं बा ! हो ॥ १ ॥
व्यसनार्णवांत बुडतां सुग्रीवा साधुला महा प्लवगा ।
तारावया सहायें मेळविला त्वांचि राम हा प्लव गा ! ॥ २ ॥
प्रभुनें बहु पाठविले निजरत्नाच्या करावया शोध ।
तो धन्य त्वां केला, लाजविले सर्वही महायोध ॥ ३ ॥
वांचविला प्राणांतव्यसनीं आणोनि औषधीगिरिला ।
तूं पविकवच म्हणोनि न खळ हिंडे रामशरनखीं चिरिला ॥४॥
व्यसनीं रामादि म्हणति तुजला, ' बा ! धांव पाव हनुमंता ! ' ।
हंता तूंचि खळांचा, यश पावो काळ, होय अनुमंता ॥ ५ ॥

---

१ श्रीरामाच्या पद्कमलाच्या ठिकाणीं भ्रमरासारखा नित्य रमणारा. २ उदासीनता टाकून दे व मजवर द्या कर. ३ संकट समुद्रांत. ४मोठ्या वानराला. ५ मित्रें. सुग्रीवाचा मित्र जो तूं त्यानें त्वां त्याला ताराया राम हाच प्लव म्ह० नौका मिळविलीस ! ६ सीतादेवीचा ७ मोठे कसलेले वीर. ८ प्राण घेणाऱ्या संकटांत. ९ द्रोणपर्वताला. १० वज्र. ११ संकटांत. १२ मारणारा. १३ अनुमोदन देणारा. काळाला राक्षसांचा नाश केल्याचें श्रेय मिळो पण. रावणादिकांचा फडशा तूंच उडविलास; काळानें तुला संमती मात्र दिली तूंच काळरूप झालास.

बा ! प्लवगांत तुवांचि व्रत मुख्य ब्रह्मचर्य वागाविलें, ।
जागविलें मन[1] योगीं, ज़गदुपकारार्थ देह भोगविलें[2] ॥ ६ ॥

तव विक्रमाविणें[3], पळभरिहि न येतींच खळबळें[4] वळणी[5] ।
श्रीमद्रामायणरस रसिकांला स्पष्ट लागता अळणी[6] ॥ ७ ॥

आहेसि याचि लोकीं रामप्रभूचा बहिश्चर[7] प्राण ।
मज बहु तुझा भरंवसा कीं बा करिशील तूं परित्राण[8] ॥ ८ ॥

अज्ञानदेशमुखें[9] या मज भवसिंधूंत[10] कोंडिले क्रूरें ।
शूरें घ्यावा माझा त्वांचि समाचार सत्कृपापूरें[11] ॥ ९ ॥

आधीं नित्य जपावें दीनातें, फावल्यास नामातें ।
ऐसें भूतदयान्वित जें बहुमत[12] होय दास्य रामा तें ॥ १० ॥

या जी उद्धार करा, दीनाचा पाहतां किती अंत ? ।
संत न अंत पहाती, हातीं असतां समर्थ भगवंत ॥ ११ ॥

—मोरोपंत

---

१ प्रभूचें व आपलें ऐक्य करण्यांत जीव व परमात्मा यांचें ऐक्य हाच योग. २ कष्टविलें. ३ पराक्रमावांचून. ४ राक्षसांची सेना. ५ वठणीला आली नसती. ६ रामायणाला तुझ्या पराक्रमामुळें सारी गोडी आली आहे ! ७ बाहेर फिरणारा. ८ संरक्षण. ९ अज्ञानरूप रावणानें. १० संसारसागरांत. ११ उत्तम दयेचा समुद्र. १२ भूतदयेनें भरलेलें जें दास्य तेंच रामाला अधिक आवडतें. दीनोद्धार हीच खरी रामसेवा होय.

# आरत्या.

[ १ ]

सत्राणें[1] उड्डाणें हुंकार वदनीं। कांरि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनीं। कडाडिलें ब्रह्मांड धोका[2] त्रिभुवनीं। सुरवर नर नीशाचर त्या झाल्या पळणी[3]। जयदेव जयदेव जयजय हनुमंता। तुमचेनि प्रतापें न भिथे कृतांता। जयदेव जयदेव ॥ १ ॥ दुमदुमलें पाताळ उठला पडशब्द[4]। धगधगिला धरणीधर मानीला खेद[5]। कडाडिले पर्वत उडुगण[6] — उच्छेद। रामीं रामदासा शक्तीचा[7] शोध ॥ जयदेव ॥ २ ॥

( २ )

जयदेव जयदेव जय महारुद्रा ॥ आरत[8] भेटीची दीजे कपींद्रा ॥ जयदेव ॥ भीमभयानक रूप अद्भुत। वज्रदेही दिसे जैसा पर्वत ॥ टोंकारूनि नेत्रें रोमें थरथरित। स्थिरता नाहीं चंचळ झाला उदीत[9] ॥ ॥ जय० ॥ १ ॥ हुंकारूनी बळें गगनीं ऊसळला। अकस्मात जानकीसी भेटला ॥ वन विध्वंसूनी अखंया[10] मारिला। ततक्षणें लंकेवरी चवताळिला ॥ ॥ जय० ॥ २ ॥ आटोपेना वानर हटवादी[11] धीट।

---

१ सवेग, वेगाचें. २ भय, ३ देव दानव व मानव यांना महद्भय उत्पन्न झालें. ४ पडसाद. ५ शेष घाबरा झाला. ६ नक्षत्रांचें पतन. ७ सीतादेवीचा शोध लावला. ८ आवड. ९ उडी मारायला उद्युक्त. १० रावणाचा पुत्र. ११ निग्रही.

प्रज्वाळीला जाळूं पाहे त्रिकूट । मिळूनि रजनीचर
कारिती बोभाट । धडाडिला वन्ही शिखा लांबट ॥
॥ जयदेव ॥ ३ ॥ कडकडित ज्वाळा भडका विशाळ ।
भुभुःकारें करुनी भोवंडी लांगूळ । थोर हलकल्लोळ पळती
सकळ । वोढवला वाटे प्रळयकाल ॥ जय देव ।४।
तृतीय भाग लंका होळी पै केली । जानकीची शुद्धि[2]
श्रीरामा नेली । देखोनि आनंदें सेना गजबजली ।
रामीं रामदासा निजभेटी झाली ॥ जय देव० ।५।

[ २ ]

॥ जयदेव जय देव जय जय बलभीमा । आरती
ओवाळूं सुंदर गुणसीमा ॥ जयदेव ॥ १ ॥
कोटीच्या कोटी गगनीं उडाला ॥ अचपळ चंचल
द्रोणाचल घेऊनि आला ॥ आला गेला आला कामा
बहुतांला ॥ वानर कटका चुटका लावुनिया गेला ॥
उत्कट बळ तें तुंबळ खळबळली सेना ॥ चळवळ
करितां तुळना कोणा दीसेना ॥ उदंड कीर्ती तेथें
मनही बैसेना ॥ दास ह्मणे न कळे हा मोठा कीं
सांना ॥ जय देव जय देव ॥ २ ॥

**भजनें.**

१ रघुपति राघव राजाराम । पतीत पावन सीताराम ॥ १ ॥
२ नारायण विधि वसिष्ठ राम । रामदास कल्याणधाम ॥ २ ॥

---

१ चळवळ फिरवी. २ शोध, तपास ३ पुष्कळांचा उपयोगी पडला. लहान.

३ सीताशोकविनाशनचंद्रा । जय बलभीमा महारुद्रा ॥ ३ ॥
४ राम लक्ष्मण जानकी । जय बोलो हनुमानकी ॥ ४ ॥
५ मारुतिराया बलभीमा । शरण आलों मज द्या प्रेमा ॥ ५ ॥
६ रामराम राम । जय सीताभिराम ॥

---

## उपसंहार.

हनुमंत आमुची कुळवल्ली[1] । राममंडपीं वेला गेली ।
श्रीरामभजनें फळली[2] । रामदास बोले ॥ १ ॥
आमुचे कुळीं हनुमंत । हनुमंत आमुचें दैवत ।
तयावीण आमुचा परमार्थ । सिद्धीतें न पावे कीं ॥ २ ॥
साह्य आह्मांसी हनुमंत । आराध्यदैवत श्री रघुनाथ ।
गुरु श्रीराम समर्थ । उणें काय दासासी? ।
दाता एक रघुनंदन । वरकड लेंडी देईल कोण ।
हें त्यागोन आह्मी जन । कवणाप्रती मागावें ॥ ४ ॥
ह्मणोनी आह्मी **रामदास** । रामचरणीं आमुचा विश्वास ।
कोसळोनि पडो हें आकाश । परी आणिकाची आस न पाहूं ।५
स्वरूपसांप्रदाय अयोध्या मठ । जानकी देवी रघुनाथ दैवत
'**मारुती–उपासना**' नमस्त। वाढविला परमार्थ **रामदासीं**

---

१ कुळाची वल्ली. २ रामभजनांची तिला फळें आलीं. ३ भिकारी. ४ ज्याचे ज्याला रामदास्य व तत्प्रीत्यर्थ मारुति-उपासना करणें असेल त्यानें त्यानें 'आकाश कोसळून पडो, पण मी दुसऱ्यापुढें कालत्रयीं हात पसरणार नाहीं' व्रत अगोदर पाळलं पाहिजे. रामाशिवाय राम-दासाला दुसरा स्वामी ठाऊक नसला पाहिजे !